**अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील “उपसंचालक, गट-अ” या संवर्गातून “सहसंचालक, गट-अ” या संवर्गातील पदावर पदोन्नतीने नियुक्ती**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः पदोनि-११२१/प्र.क्र.४०/का.१४२७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: १४ सप्टेंबर, २०२१.

**शासन आदेश :-**

अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील “उपसंचालक, गट-अ” संवर्गातील खालील अधिकाऱ्यांना “सहसंचालक, गट-अ” संवर्गातील (सुधारित वेतन मॅट्रिक्समधील वेतन स्तर रुपये S-२३: ६७,७००-२,०८,७००) या पदावर खालील परिच्छेद -२ येथे नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून या आदेशान्वये निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे. सदरहू पदोन्नतीनंतरची त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ ६ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | उपसंचालक यांचे नाव, पदनाम व सध्याचे कार्यालय | प्रवर्ग | पसंतीचा विभागीय संवर्ग | वाटप केलेला विभागीय संवर्ग | पदोन्नतीनंतर पदस्थापना करण्यात आली ते पद व कार्यालय |
|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) |
| १ | श्रीमती रु.प्र.थोते<br>उपसंचालक,<br>अर्थ व सांख्यिकी संचालनालय,<br>मुख्य कार्यालय, मुंबई | खुला | कोकण २ | कोकण २ | सहसंचालक (प्रशिक्षण),<br>अर्थ व सांख्यिकी संचालनालय,<br>मुख्य कार्यालय, मुंबई |

२. सदर पदोन्नती खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

१) सदर आदेशानुसार पदोन्नतीच्या पदाचा पदभार स्वीकारावा व तसे केल्याबद्दलचे कार्यभार हस्तांतरण प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे. तसेच त्याची एक प्रत संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांना अग्रेषित करावी. पदोन्नती स्वीकारावयाची नसल्यास एक महिन्याच्या आत त्याबाबत लेखी स्वरुपात शासनास कळवावे.

२) मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दिनांक ४/८/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये पदोन्नतीतील आरक्षण अवैध ठरविले असल्याने व मा.सर्वोच्च न्यायालयाने मा.उच्च न्यायालयाच्या या निर्णयास अद्याप स्थगिती दिली नसल्याने पदोन्नतीच्या कोटयातील सर्व रिक्त पदे दिनांक २५/४/२००४ च्या स्थितीनुसार सेवाज्येष्ठतेने भरण्याबाबतचा निर्णय सामान्य प्रशासान विभागाच्या दिनांक ७/५/२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला.

३) सदर पदोन्नत्या निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ वरिल अंतिम निर्णयाच्या अधीन असतील. सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

४) सदर अधिका-यांनी पदोन्नतीच्या पदावर तात्काळ रुजू होणे आवश्यक आहे.

५) पदोन्नतीच्या पदावर रुजू झाल्यानंतर संबंधित अधिकाऱ्यांनी ७ दिवसांच्या आत त्यांचे ई-प्रोफाईल सुधारित करुन त्याची प्रत शासनास तसेच अर्थ व सांख्यिकी संचालनालयास सादर करावी.

६) या आदेशान्वये पदोन्नत होणाऱ्या अधिकाऱ्यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

७) सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १२/९/२०१६ च्या शासन निर्णयान्वये "वरच्या संवर्गात पदोन्नतीसाठी निवड झाल्यानंतर अथवा तत्पूर्वीच एखाद्या अधिका-यांने पदोन्नतीचे पद स्विकारण्यास नकार दर्शविल्यास, त्याचे नांव पदोन्नतीसाठी पात्र असणा-या अधिकारी/कर्मचा-यांच्या निवड यादीतून काढून टाकण्यात येईल व पुढील दोन वर्षी होणा-या निवडसूच्यांमध्ये संबंधित अधिका-यांच्या नावाचा विचार न करता तिस-या वर्षाच्या निवडसूचीत संबंधित अधिका-यांची पदोन्नतीसाठीची पात्रता तपासण्यात येईल. त्यावेळच्या गुणवत्तेप्रमाणे संबंधित अधिका-यांची पदोन्नतीसाठी पात्र ठरल्यास त्याचा नियमित निवडसूचीत समावेश करण्यात येईल". पदोन्नतीचा कार्यभार स्विकारल्यानंतर पदोन्नती नाकारता येणार नाही.

८) या पदोन्नती आदेशातील ज्या अधिका-यांना कालबध्द पदोन्नती/आश्वासित प्रगती/सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा फायदा मिळालेला नाही त्यांची महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, २०१९ नुसार पदोन्नतीच्या पदाच्या वेतनश्रेणीतील वेतन निश्चिती करण्यात यावी.

९) सदर आदेश निर्गमित झाल्यापासून ३० दिवसांच्या आत पदोन्नतीच्या पदाचा पदभार स्विकारावा. या पदोन्नती आदेशातील जे कर्मचारी आदेश प्राप्त झाल्यानंतर विहित कालावधीत पदोन्नती स्विकारणार नाहीत किंवा विविध सबबी खाली पदस्थापना स्विकारण्यास टाळाटाळ करतील त्याना वित्त विभाग, शासन निर्णय क्र:वेतन-१११९/प्र.क्र.३/२०१९/सेवा-३, दिनांक २/३/२०१९ नुसार सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित सेवांतर्गत प्रगती योजनेखाली मंजूर केलेले लाभ काढून घेण्यात येतील, तथापि, अशा लाभांची वसुली करण्यात येणार नाही. तसेच असे लाभ काढून घेतल्यानंतर संबंधितांची वेतननिश्चिती ही त्यांना जणु काही या योजनेचे लाभ देण्यात आले नव्हते असे समजून महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम १२ च्या तरतुदींनुसार करण्यात येईल.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९१४११३८०५४११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deepak Shivajirao Desai

Digitally signed by Deepak Shivajirao Desai
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d11b2ee4dfa01facc6e58028a3bde93d4ac81d87ed6247ca0fb3a827602426f, serialNumber=f3a85577333780db2d347fab235605a8c51e9cf8dc3339f64aba61827c8c000d, cn=Deepak Shivajirao Desai
Date: 2021.09.14 15:28:00 +05'30'

**( दिपक देसाई )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्रीमती रु.प्र.थोते
उपसंचालक,
अर्थ व सांख्यिकी संचालनालय,
मुख्य कार्यालय, मुंबई
(मार्फत: अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई)

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
२. मा.मंत्री (नियोजन)/ मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव,
३. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र राज्य विधानसभा/ विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (*पत्राने)
५. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
६. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (का.१२/१६-ब), मंत्रालय, मुंबई
७. सर्व सह सचिव/उप सचिव/ विशेष कार्य अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई/ नाशिक /पुणे/ औरंगाबाद/ नागपूर/अमरावती
९. सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई /नाशिक/ पुणे/ औरंगाबाद/नागपूर/अमरावती
१०. उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुख्य कार्यालय, मुंबई
११. लेखा अधिकारी, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुख्य कार्यालय, मुंबई
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१४. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
१५. निवड नस्ती